**राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ कार्यालयात कार्यरत कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी-१५१०/प्र.क्र.२१७/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २९ ऑगस्ट, २०१८

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग शासन आदेश क्र.एएससी १५१०/प्र.क्र.२१७/१४-अ, दिनांक २०-०१-२०१४
२) राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ, यांचे क्रमांक: रामाआ/परिक्षा/प्र.क्र.०४/ २०१८/आस्था/४६५८, दिनांक ३१-०५-२०१८ चे पत्र.
३) राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ, यांचे क्रमांक: रामाआ/लेखा/२०१८/७७४८ ०९-०८-२०१८ चे पत्र.

**शासन आदेश**

श्रीमती मा.रा. देशमुख, सहायक कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग ह्या दिनांक ०२-०६-२०१४ पासून राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ येथे सहायक कक्ष अधिकारी पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. त्यांचा प्रतिनियुक्तीचा ४ वर्षाचा कालावधी दिनांक ०१.०६.२०१८ रोजी पूर्ण झालेला आहे. तर श्रीमती उ.र.नगरकर , लिपिक-टंकलेखक, कृषि व पदुम विभाग ह्या दिनांक १७-०६-२०१४ पासून राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ येथे लिपिक-टंकलेखक पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. त्यांचा प्रतिनियुक्तीचा ४ वर्षाचा कालावधी दिनांक १६.०६.२०१८ रोजी पूर्ण झालेला आहे.

२. राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक ३१-०५-२०१८ च्या पत्रान्वये श्रीमती देशमुख यांच्या वैद्यकीय कारणास्तव तसेच कौटुंबिक अडचणीस्तव व त्यांच्या आयोगातील कामाचा अनुभव विचारात घेता त्यांच्या प्रतिनियुक्तीस २ वर्ष मुदतवाढ देण्याची, तसेच त्या कार्यालयाने संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक ०९-०८-२०१८ च्या पत्रान्वये श्रीमती नगरकर यांच्या पतिच्या वैद्यकीय कारणास्तव तसेच कौटुंबिक अडचणीस्तव त्यांच्या प्रतिनियुक्तीस २ वर्ष मदुतवाढ देण्याची विनंती केली आहे.

३. राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ यांनी श्रीमती देशमुख्य व श्रीमती नगरकर यांच्या प्रतिनियुक्तीस ५ व्या वर्षी मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, या शासन निर्णयास शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दिनांक १६-०२-२०१८ अन्वये दि.१७-१२-२०१६ च्या शासन निर्णयातील परि.५ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

क) परि.क्र ५(अ) (३) पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे.:-

परि.क्र. ५(अ) (३):- प्रतिनियुक्ती प्रथमत: ३ वर्षासाठी देण्यात यावी व संबंधित अधिकाऱ्याची इच्छुकता व संवर्ग नियंत्रण विभागाचे सहमतीने हा कालावधी चौथ्या वर्षाकरिता वाढविण्यात यावा. परंतु चार वर्षांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर आणखी एक वर्षासाठी म्हणजेच ५ व्या वर्षासाठी मुदतवाढ द्यावयाची झाल्यास मा. मुख्यमंत्री यांची विनिर्दिष्टपणे मान्यता घेण्यात यावी. ५ वर्षाचा कालावधी संपल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत मुदतवाढ अनुज्ञेय राहणार नाही.

५. वर परि. ४ मधील शासन निर्णयातील तरतुदीस अनुसरुन ५ व्या वर्षी श्रीमती देशमुख व श्रीमती नगरकर यांच्या प्रतिनियुक्तीस १ वर्षासाठी मुदतवाढ देण्याबाबतची विनंती शासन स्तरावर मान्य करण्यात आली आहे. तेव्हा या आदेशान्वये श्रीमती देशमुख, यांच्या प्रतिनियुक्तीस (दिनांक ०१-०६-२०१९) पर्यंत तर श्रीमती नगरकर यांच्या प्रतिनियुक्तीस (दिनांक १६-०६-२०१९) पर्यंत फक्त एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे.

६. प्रतिनियुक्ती संदर्भात सर्व अटी व शर्ती या विभागाचे आदेश क्र.एएससी १५१०/प्र.क्र.२१७/१४-अ, दिनांक २०-०१-२०१४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे असतील. या दोन्ही कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीस अंतिम स्वरुपाची मुदतवाढ असून त्यांना या पुढे कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही. तसेच त्यांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव पुन्हा राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठाने या विभागाकडे सादर करु नये. तसेच या दोन्ही कर्मचाऱ्यांनी प्रतिनियुक्तीस मुदतवाढ मिळण्याबाबत राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ यांच्याकडे व या विभागाकडे वैयक्तिक अर्ज सादर करु नये तसेच बाह्ययंत्रणेद्वारे देखील प्रयत्न करु नये.

७. श्रीमती देशमुख, सहायक कक्ष अधिकारी या महसूल व वन विभागाच्या आस्थापनेवर कार्यरत होत्या, तर श्रीमती नगरकर, लिपिक-टंकलेखक, या कृषि व पदुम विभागाच्या आस्थापनेवर कार्यरत होत्या या दोन्ही कर्मचाऱ्यांच्या प्रशासकीय बाबी संबंधित कर्मचाऱ्याचे प्रशासकीय विभाग व सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-६ यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२९१५१४२९४१०७ असा आहे. सदरहू शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.08.29 15:15:45 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संबंधित कर्मचारी (राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ कार्यालयामार्फत)

**प्रत,**

१. सचिव, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय इमारत, १३ वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०००३२
२. उप सचिव, राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ, प्रशासकीय इमारत क्र.२, सिव्हिल लाईन्स, नागपूर
३. सह/उप सचिव (आस्थापना), महसूल व वन विभाग/कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
४. उप सचिव, (कार्यासन ६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
५. निवडनस्ती, का.क्र.१४-अ /संग्रहार्थ